अनुसूचित जमाती प्रमाणपत्र पडताळणी समित्यांकडील प्रलंबित प्रकरणांचा आढावा घेऊन सदर प्रकरणे तात्काळ निकाली काढण्याच्यादृष्टीने आवश्यक उपाययोजना सुचविण्यासाठी मा.उच्च न्यायालयाचे निवृत्त न्यायाधीश यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या तज्ञ समितीस मुदतवाढ देणेबाबत-

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः एसटीसी-२०१४/प्र.क्र.१२६/का.१०
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ८ जुलै, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः एसटीसी-२०१४/प्र.क्र.१२६/ का.१०, दिनांक २८.४.२०१५
२) शासन शुध्दिपत्रक क्रमांकः एसटीसी-२०१४/प्र.क्र.१२६/ का.१०, दिनांक ३०.४.२०१५.
३) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्र. आसंप्रसं/प्र.क्र.४७०/का.३/२७९, दिनांक २.६.२०१५.

प्रस्तावना -

आदिवासी समाज कृती समिती यांनी मा.मुंबई उच्च न्यायालय येथे दाखल केलेल्या जनहित याचिका क्र.७१/२०१४ या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दिनांक ४.२.२०१५ रोजी दिलेल्या अंतरिम आदेशानुसार, सर्व अनुसूचित जमाती प्रमाणपत्र पडताळणी समित्यांकडील प्राप्त व प्रलंबित प्रकरणांचा आढावा घेऊन सदर प्रकरणे तात्काळ निकाली काढण्याच्यादृष्टीने आवश्यक उपाययोजना सुचविण्यासाठी तसेच सध्या कार्यरत असलेल्या जात प्रमाणपत्र पडताळणी समित्या व त्यांची कार्यपध्दती यांचा अभ्यास करुन समित्यांची संख्या व त्यामधील आवश्यक अधिकारी/कर्मचारी यांची संख्या निश्चित करण्याबाबत तसेच त्यांना विविध सोयी-सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी उपाययोजना सुचविण्यासाठी मा.उच्च न्यायालयाचे निवृत्त न्यायाधीश मा.श्री.आर.वाय.गानू यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २८.४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये "एक तज्ञ समिती" गठीत करण्यात आली. सदर समितीस एक महिन्यामध्ये आपला अहवाल शासनास सादर करण्याची मुदत देण्यात आलेली असून सदर समितीची मुदत दिनांक २८.५.२०१५ रोजी संपत असल्यामुळे आयुक्त, आदिवासी संशोधन व

प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी संदर्भ क्र.३ येथील दिनांक २.६.२०१५ रोजीच्या पत्रान्वये दिनांक ३१.७.२०१५ पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देणेबाबत कळविले असल्याने, त्यानुषंगाने सदर तज्ञ समितीस दिनांक ३१.७.२०१५ पर्यंत आपला अहवाल शासनास सादर करण्याबाबत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

उपरोक्त प्रस्तावनेच्या अनुषंगाने मा.मुंबई उच्च न्यायालयातील जनहित याचिका क्र.७१/२०१४ प्रकरणी मा.न्यायालयाने दिनांक ४.२.२०१५ रोजी दिलेल्या अंतरिम आदेशानुसार, मा.श्री.आर.वाय.गानू, निवृत्त न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, एसटीसी-२०१४/प्र.क्र.१२६/ का.१०, दिनांक २८.४.२०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या तज्ञ समितीची मुदत दिनांक २८.५.२०१५ रोजी संपुष्टात येत असल्याने सदर समितीस दिनांक ३१.७.२०१५ पर्यंतच्या कालावधीकरिता या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे.

प्रस्तुत तज्ञ समिती मा.उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार स्थापन करण्यात आली असून समितीची कार्यकक्षा व प्रयोजन विचारात घेता, सदर समितीचा अहवाल प्राप्त करुन घेण्याच्या दृष्टीकोनातून दिनांक ३१.७.२०१५ पर्यंतची मुदतवाढ ही अंतिम असून यानंतर कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही.

सदर तज्ञ समितीने करावयाची कामे, तिची कार्यकक्षा, तिच्या अटी व शर्ती या संदर्भातील दिनांक २८.४.२०१५ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणेच राहतील.

सदर समितीसाठी होणारा खर्च "२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (२४) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, १३ कार्यालयीन खर्च "२२२५ ४१२२" या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२००/व्यय-१४, दिनांक १८.६.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०८१६३६४८९६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.07.08 16:38:46 +05'30'

(ल.गो. ढोके)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई

२) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई

३) मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई

६) मा.अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

७) मा.श्री.आर.वाय.गानू, सेवानिवृत्त न्यायाधीश (मा.मुंबई उच्च न्यायालय), प्लॉट नं.बी-३०१, ३ रा मजला, टिळक वैशाली को.ऑ.हौ.सो., बिल्डिंग नं.१४, टिळक नगर, चेंबुर, मुंबई - ४०० ०८९.

८) मा.प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

९) मा. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१०) मा.सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

११) श्री.सं.भा. सरकुंडे, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे

१२) श्री.ई.जी. भालेराव, सह आयुक्त, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, नंदुरबार.

१३) डॉ.श्री.विवेक घोडके, उपजिल्हाधिकारी (महसूल), जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा

१४) श्री.स.नु.गावीत, सेवानिवृत्त सह सचिव, बी-५०१, मालवणी श्री.अष्टविनायक को.ऑ.हौ.सो., प्लॉट नं.२५, समता कॉम्प्लेक्स, म्हाडा, मालाड (प.), मुंबई-९५,

१५) श्री.गोवर्धन शांताराम मुंढे, सहाय्यक शिक्षक, (ZPCPS) मांडवा, ता.किनवट, जि.नांदेड-४३१८०४.

१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर

१७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१८) जिल्हा कोषागार अधिकारी,

१९) सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ठाणे/पुणे/ नाशिक/औरंगाबाद/नागपूर/गडचिरोली/नंदुरबार/अमरावती

२०) सर्व सह/उप सचिव/अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

२१) सर्व कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

२२) निवड नस्ती/का.१०